राज्यातील कृषी व यंत्रमाग ग्राहक यांना वीज दरात सवलत दिल्यामुळे महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित यांना द्यावयाचे अर्थसहाय्य. सन २०१५-२०१६ उर्वरित अनुदान (योजनेत्तर)

**महाराष्ट्र शासन**
**ऊद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,**
**शासन निर्णय क्र.निधिवि-२०१५/प्र.क.६९/ऊर्जा-३**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक**
**मंत्रालय, मुंबई - ४०००३२.**
**दिनांक : १३ जुलै, २०१५**

**संदर्भ** :- १) शासन निर्णय उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्र.विपुअ-२०१२/प्र.क्र.९१/ऊर्जा-३, दि.११/१०/२०१२

२) शासन निर्णय उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्र.टॅरिफ-२०१२/प्र.क्र.९१भाग-२/ ऊर्जा-३, दि.०५/०३/२०१३

३) व्यवस्थापकीय संचालक, वितरण यांचे पत्र क्र. व्यस/महावितरण/१०८१५, दि.१५/०४/२०१५

**प्रस्तावना** :-

शासन निर्णय दि.११/१०/२०१२ च्या शासन निर्णयान्वये राज्य शासनाकडून कृषी ग्राहक व यंत्रमाग ग्राहक यांना वीज दरात सवलत देण्यात येते त्यासाठी सन २०१५-२०१६ या वित्तीय वर्षात रु.४९६२,६९,००,०००/- इतकी अर्थसंकल्पीय तरतूद आहे. रु.८८५,८०,००,०००/- (आठशे पंच्याऐंशी कोटी ऐंशी लाख फक्त) रोखीने महावितरण यांना वितरीत करण्यासंदर्भातील बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :-

कृषी ग्राहक व यंत्रमाग ग्राहक यांना सन २०१४-२०१५ या आर्थिक वर्षात वीज दरात दिलेल्या सवलतीसाठी महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित यांना देय असलेली उर्वरित अनुदानाची रक्कम रु.८८५,८०,००,०००/- (आठशे पंच्याऐंशी कोटी ऐंशी लाख फक्त) रोखीने वितरीत करण्यास या निर्णयाद्वारे शासन मंजूरी देण्यात येत आहे.

२. वरील बाबींचा खर्च "मागणी क्रमांक के-६, २८०१ वीज, ०५ पारेषण व वितरण, ८०० इतर खर्च, (००) (०१) कृषी विषयक व यंत्रमाग विषयक प्रशुल्क कमी करण्यासाठी वीज वितरण / पारेषण अनुज्ञप्तीधारकांना अर्थसहाय्य (योजनेत्तर) (२८०१२६१५) ३३ अर्थसहाय्य" या लेखाशिर्षा खाली खर्ची टाकावा व तो सन २०१५-२०१६ या वित्तीय वर्षासाठी मंजूर असलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

३. सदर रक्कम अधिदान व लेखा अधिकारी यांच्या मार्फत कोषागारातून काढून महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित, मुंबई यांना अदा करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून श्री.वि.म.राजुरकर, अवर सचिव व नियंत्रण अधिकारी म्हणून व श्री.ब.शे.मांडवे, उप सचिव, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई -३२ यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. त्यांनी महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित, मुंबई यांना मंजूर झालेली रक्कम रु.८८५,८०,००,०००/- (आठशे पंच्याऐंशी कोटी ऐंशी लाख फक्त) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई येथून महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित यांच्या नावे स्वतंत्ररित्या धनादेश काढून वितरीत करण्याची कार्यवाही करावी.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.२८६/२०१५, व्यय-१६, दि.०७/०७/२०१५ अन्वये मिळालेल्या त्या विभागाच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०१५०७१३१७०४२३०४१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vilas M Rajurkar

Digitally signed by Vilas M Rajurkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vilas M Rajurkar
Date: 2015.07.13 17:05:32 +05'30'

**(वि.म.राजुरकर)**
शासनाचे अवर सचिव

**प्रत:-**

१) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ सूत्रधार कंपनी मर्यादित, हॉंगकॉंग बँक बिल्डिंग, फोर्ट, मुंबई.
२) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित, प्रकाशगड, वांद्रे, (पूर्व), मुंबई-५१
३) सचिव महाराष्ट्र विद्युत नियामक आयोग, वर्ल्ड ट्रेड सेंटर नं.१, १३ वा मजला, कफ परेड, कुलाबा, मुंबई-०५
४) महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई-४०००२०.
५) महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई-४०००२०.
६) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.
७) अधिदान व लेखा अधिकारी, अराप / रालेवि-१), मुंबई.
८) अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई.
९) निवासी लेखा अधिकारी, वांद्रे (पूर्व), मुंबई-४०००५१.
१०) अवर सचिव (रोख), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई -४०००३२.
११) विशेष कार्य अधिकारी (ऊर्जा-५), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई -३२.
१२) क.अ.अधिकारी (प्रशा-१), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई -४०००३२.
१३) वित्त विभाग, (अर्थसंकल्प-१३ / साधनसंपत्ती / साऊ / व्यय-१६) मंत्रालय, मुंबई-३२.
१४) मुख्य विद्युत निरीक्षक, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, सार्वजनिक बांधकाम प्रशासकीय इमारत, कर मार्ग रामकृष्ण चेंबूर, ३ रा मजला, चेंबुर, (पूर्व), मुंबई-४०००७१.
१५) निवडनस्ती (ऊर्जा-३) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई -४०००३२.